# भृगुसंहिता आणि नाडी ग्रंथ संहिता यातील समानता आणि फरक E Book 37



भृगु व शुक्र महर्षी



महर्षी अगस्त्य आणि अन्य तमिळ भाषी महर्षी

**व्यक्तीचे भविष्य कथन करून त्याला पडलेल्या समस्यांची उकल करायला दैवी उपायांचे मार्गदर्शन करणे, हा महत्वाचा समान दुवा दोन्हीत आहे. मात्र त्यात अनेक फरक जाणवतात.**

दक्षिणेतील नाडी ग्रंथ ताडपट्टीवर कोरून लिहिलेले असतात तर उत्तर भारतातील भृगु, अरुण, सूर्य, कपाली आदि संहिता हाताने निर्मिती जाडसर कागदावर शाईने लिहिलेले लिहिलेल्या असतात. साधारण त्या देवनागरी लिपीत लिहिलेल्या असतात परंतु उत्तर प्रदेशातील प्रतापगढ, लखनऊ व मेरठ मधे काही ठिकाणी त्या पाली लिपीत लिहिलेल्या सापडतात. नेपाळमधे त्या नेपाळी लिपीत असल्याची संभावना असल्याचे सांगतात. तमिळ लिपी ही ग्रंथम आणि ब्राह्मी लिपीच्या स्थित्यंतरातील काळात वापरली जाणारी भाषा व लिपी असल्याचे माहितगार म्हणतात.

नाडीतील महर्षी शंकर पार्वतीला वंदन करून भविष्य कथन करायला प्रेरणा मागतात. तर भृगु महर्षी विष्णूंची तशी वंदना संहितेत असतेच असे नाही.

भृगु संहिता गुरू भृगु व शिष्य शुक यांच्यातील संवाद रुपाने रचली आहे. नाडी पट्टीत क्वचित अपवाद वगळता सर्व कथने व्यक्तीशी केलेलासंवाद असतो. काही नाडीपट्टयात शिष्य विचारणा करून ग्रहताऱ्यांच्या स्थानांवरून संवाद आढळतो.

ताडपट्टया जीर्ण झाल्या तरी त्यावरील मजकूर कोरलेला असल्याने पुसला जात नाही. संहितेचा कागद जीर्ण व शाईचा रंग उडल्याने लेखन अस्पष्ट झालेले जाणवते.



नाडीतील लेखन काव्य रुपाने श्लोक बद्ध रचलेले लक्षात येते. नाडी ग्रंथांचे गायन केलेजाते. भृगुसंहितेत गद्य वर्णन असते. अनेकदा ते त्रोटक वाटते.

विवक्षित ताडपट्टी व्यक्तीच्या हाताच्या अंगठ्याच्या ठशावरून शोधतात. नाडीपट्टी एकदा सापडली की त्यात जन्म ग्रहदशा तयार मिळते. भृगु संहिता पंजाबीत कुंडलीला'टेवा' म्हणतात त्याच्या म्हणजे कुंडलीच्यासहायाने शोधतात.

नाडीपट्टीत आईवडील पती पत्नीचे व स्वतःचे नाव, जन्म दिनांक, शिक्षण, नोकरी धंदा याचा उल्लेख हटकून असतो. संहितेत तो असतोच असे नाही.




संहितेची वही किंवा भाषांतरची कॅसेट करून देण्याची पद्धत नाही. भृगु पत्रांचे फोटो काढायला, कार्बन कसोटी करायला शास्त्री परवानगी देण्याचे टाळतात.

उपाय म्हणून सांगितलेली जप-साधना नाडी केंद्रातर्फेकेली जाते. तशी सोय भृगु केंद्रात करून दिली जात नाही.

नाडी केंद्रे गेल्या काही वर्षात भारतभर ३००च्या स्थापित झाली आहेत. पैकी ५० तर महाराष्ट्रात आहेत. भृगु संहिता केंद्रांच्या संख्येत फारशी वाढ झालेली नाही.



रमणी गुरुजी तांबरम चेन्नई काकपुजंदर (तमिळ उच्चार) जीवनाडीचे वक्ता



श्री शामाचरण तिवारी होशियारपुर भृगुवक्ता

समाप्त